

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग,**

मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.

---

क्रमांक- **आरएलपी- ०२२२/प्र.क्र. ४३/विशा- १ ब** दिनांक- २८ फेब्रुवारी, २०२२.

**परिपत्रक**

**महाशिवरात्री- २०२२ मार्गदर्शक सूचना**

कोविड- १९ च्या अनुषंगाने यावर्षी सर्व धर्मीय सण, उत्सव तसेच सर्व कार्यक्रम अतिशय साधेपणाने साजरे करण्यात येत आहेत. कोरोनाचा प्रादुर्भाव अद्यापही कमी झालेला नसल्याने या वर्षी दिनांक १ मार्च,२०२२ रोजी येणाऱ्या महाशिवरात्री उत्सवाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत :-

१. कोविड-१९ च्या संसर्गजन्य परिस्थितीचा विचार करता महाराष्ट्र शासन महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागाचे परिपत्रक क्र. DMU/२०२०/CR९२/DisM-१, दि. ८/१/२०२२ तसेच क्र. DMU/२०२०/CR.९२/DisM-१, दि. ३१/१/२०२२ अंतर्गत दिलेल्या सूचनांचे काटेकोर पालन करावे.

२. महाशिवरात्री हा भारतातील पवित्र उत्सवांपैकी एक मोठा उत्सव मानला जातो. देशभरात हिंदू धर्मीय लोक महाशिवरात्री मोठ्या उत्साहाने साजरी करतात. त्या अनुषंगाने सर्व मंदिर विश्वस्त/व्यवस्थापक यांनी मंदिरात देवदर्शनासाठी गर्दी होणार नाही व सोशल डिस्टन्सिंगचे पालन होईल याकडे विशेष लक्ष देणे आवश्यक आहे.

३. कोविड- १९ चा संसर्ग टाळण्यासाठी प्रत्येक शिवमंदिराच्या आतील बाजूस सोशल डिस्टन्सींगचे पालन होण्याच्या दृष्टीने संबंधित विश्वस्त अथवा व्यवस्थापक यांनी योग्य त्या उपाययोजना कराव्यात. तसेच मंदिर व्यवस्थापनाने आजूबाजूच्या परिसरात निर्जंतुकीकरणाची व्यवस्था, सोशल डिस्टन्सिंग व स्वच्छतेचे नियम (मास्क, सॅनीटायझर, इ.) चे पालन होईल याकडे विशेष लक्ष द्यावे.

४. महाशिवरात्रीच्या दिवशी मंदिराच्या परिसरात हार व फुले विक्रेते यांची गर्दी होणार नाही तसेच सोशल डिस्टन्सींगच्या नियमांचे तंतोतंत पालन होईल याकडे मंदीराचे व्यवस्थापक व स्थानिक प्रशासन यांनी विशेष लक्ष द्यावे. त्याचप्रमाणे महाशिवरात्री उत्सवाच्या निमित्ताने संबंधित स्थानिक प्रशासनाचे मंडपाबाबतचे धोरण यांचेशी सुसंगत असे मर्यादित स्वरुपाचे मंडप उभारण्यात यावेत.

५. प्रत्यक्ष मंदिरात येऊन दर्शन घेऊ इच्छिणाऱ्या भाविकांनी स्वत:हून मास्कचा वापर व सोशल डिस्टन्सिंगचे पालन करावे. जेष्ठ नागरीक व लहान मुलांना मंदिरात दर्शनाकरीता शक्यतो आणू नये.

६. महाशिवरात्री निमित्त शिवमंदिरातील व्यवस्थापक यांनी दर्शनाची सुविधा ऑनलाईन, केबल नेटवर्क, वेबसाईट व फेसबुक इत्यादी द्वारे उपलब्ध करून द्यावी.

७. कोविड- १९ च्या विषाणूंचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाच्या मदत व पुनर्वसन, आरोग्य, पर्यावरण, वैद्यकीय शिक्षण विभाग तसेच संबंधित महानगरपालिका, पोलीस प्रशासन, स्थानिक प्रशासन यांनी विहित केलेल्या नियमांचे काटेकोर पालन करावे. तसेच या परिपत्रकानंतर व प्रत्यक्ष सण सुरु होण्याच्या मधल्या कालावधीत अजून काही सूचना प्रसिध्द झाल्यास त्यांचे देखील अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावरही उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०२२८१९४०४१७७२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.02.28 19:45:19 +05'30'

**(संजय खेडेकर)**
**उप सचिव, गृह विभाग.**

प्रत माहिती तथा आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.सर्व मा. महापौर, महानगर पालिका.
१२.मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६.सचिव व महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७.सर्व आयुक्त, महानगर पालिका.
१८. सर्व पोलीस आयुक्त.
१९.सर्व जिल्हाधिकारी.
२०.सर्व पोलीस अधीक्षक.
२१.सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका.
२२.निवडनस्ती.